**कृषी उन्नती योजनेअंतर्गत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान राज्यात सन २०१७-१८ मध्ये राबविण्यासाठी सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१६/ प्र.क्र.१३२/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: २६ जुलै, २०१७.

वाचा :-

१) कृषी सहकार व शेतकरी कल्याण विभाग (गळीतधान्य शाखा), भारत सरकार यांचे पत्र क्र.६-१३/२०१७-AAP(Coord) /OS दि.२७ एप्रिल, २०१७.
२) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.विप्र.२/रागतेअ.१७-१८/प्र.मा. प्रस्ताव/कृ.आ./प्र.क्र.२/ १४५/१७, दि.५ मे, २०१७.
३) शासन निर्णय कृ. रागते-१२१६/प्र.क्र.१३२/४अे, दि. १२ मे, २०१७.
४) केंद्र शासनाचे पत्र कृ.२-१४/२०१७-CA-II, दि. २९ मे, २०१७.
५) शासन निर्णय कृ. रागते-१२१७/प्र.क्र.१०४/४अे, दि. १७ जून, २०१७.
६) केंद्र शासनाचे पत्र क्र. ६-१३/२०१७-AAP (coord)/ OS, दि. २० जुन, २०१७.
७) केंद्र शासनाचे पत्र कृ.२-१४/२०१७-एमएम-I (ओएस), दि.१० जुलै, २०१७.
८) कृषी आयुक्ताल यांचे पत्र कृ. विप्र-२/रागतेअ.१७-१८/प्र.मा.प्रस्ताव/ कृ.आ.प्र.क्र.२ / २१६/१७, दि.१२ जुलै, २०१७.

प्रस्तावना:-

केंद्र शासनाने संदर्भाधीन अ.क्र. १ येथील दि २७ एप्रिल, २०१७ च्या पत्रान्वये राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाचा सन २०१७-१८ या वर्षासाठी रु.७१०६.६९ लक्ष निधीच्या कार्यक्रमास मान्यता कळविली होती. सदर कार्यक्रमास संदर्भाधीन अ.क्र. ३ येथील दि. १२ मे, २०१७ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने दि.२० जून, २०१७ च्या पत्रान्वये, सन २०१६-१७ मधील उप अभियान-१ (तेलबिया) अंतर्गत प्रलंबित अनुदान देयकासाठी केंद्र हिस्सा रु.१८०.४५ लक्ष व राज्य हिस्सा रु.४२.५६ लक्ष अशा एकूण रु.२२३.०१ लक्ष रकमेसह उप अभियान-१ (तेलबिया) चा केंद्र हिस्सा रु.४३७२.६६ लक्ष व राज्य हिस्सा रु.२८३७.३८ लक्ष अशा एकूण रु.७२१०.०४ लक्ष रकमेच्या सुधारित कार्यक्रमास मान्यता कळविली आहे.

शासन आदेशानुसार, कृषी आयुक्तालयाने केंद्र शासनास सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन, केंद्र शासनाने उपअभियान-१ (तेलबिया) मध्ये बियाणे घटकासाठी, केंद्र हिस्सा रु.३६६.०० लक्ष व राज्य हिस्सा रु.२४४.०० लक्ष असा एकूण रु.६१०.०० लक्ष एवढ्या रकमेचा

बियाणांचा लक्षांक वाढवून देऊन उपअभियान - १ (तेलबिया) चा केंद्र हिस्सा रु.४७३८.६६ लक्ष व राज्य हिस्सा रु.३०८१.३८ लक्ष असा एकुण रु.७८२०.०४ लक्ष एवढ्या रकमेचा सुधारित कार्यक्रम मंजूर केला आहे. त्यानुसार सन २०१७-१८ या वर्षाचा राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाच्या, उपअभियान-३ (वृक्ष आधारीत तेलबिया) सह एकूण रु.७९३९.७० लक्ष रकमेचा कार्यकम होतो.

केंद्र शासनाने राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाच्या सन २०१७-१८ या वर्षाच्या कार्यक्रमास कळविलेल्या सुधारित मान्यतेनुसार राज्य शासनाची सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

१. केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजने अंतर्गत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड ( National Mission on Oil seeds and Oil Palm) अभियानातंर्गत लघुअभियान-१ (तेलबिया) व लघुअभियान-३ (वृक्षआधारित तेलबिया) अंतर्गत केंद्र शासनाने संदर्भाधीन अ.क्र.७ येथील दि. १० जुलै, २०१७ च्या पत्रान्वये दिलेलया सुधारित मान्यतेनुसार, संदर्भाधीन अ.क्र.३ येथील दि.१२ मे, २०१७ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या रु.७१०६.६९ लक्ष रकमेच्या प्रशासकीय मान्यतेऐवजी रु.७९३९.७० लक्ष रक्कमेच्या कार्यक्रमास सन २०१७-१८ या वर्षासाठी सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर कार्यक्रमाचा उपअभियान निहाय तपशील खालील प्रमाणे आहे.

**(रु.लाखात)**

| अ.क्र. | उप अभियान | केंद्र | राज्य | एकुण |
|---|---|---|---|---|
| १ | उप अभियान - १ (तेलबिया) | ४७३८.६६ | ३०८१.३८ | ७८२०.०४ |
| २ | उप अभियान - ३ (वृक्ष आधारित तेलबिया) | ७१.७९ | ४७.८७ | ११९.६६ |
| | **एकुण** | **४८१०.४५** | **३१२९.२५** | **७९३९.७०** |

३) केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या सुधारित कार्यक्रमानुसार संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी जिल्हयांना सुधारित लक्षांक ठरवून घावे.

४) दि. १० जुलै, २०१७ च्या पत्रान्वये केंद्र शासनाने मंजूर केलेला कृति आराखडा विचारात घेऊन, सन २०१७-१८ मध्ये राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाचा कार्यक्रम राबविण्यात यावा. कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जात नाही, याबाबत आवश्यक ती दक्षता घ्यावी.

५) सन २०१७-१८ या वर्षात उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून सन २०१६-१७ या वर्षा मधील दायित्व प्राथम्याने निकाली काढण्यात यावे.

६) अभियानाची अंमलबजावणी करताना अ.क्र.३ येथील, दि.१२ मे, २०१७ च्या शासन निर्णयातील सुचना/ अटी शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

(७) सदर शासन निर्णय मा. प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२६१६५२०८३६०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.07.26 16:57:58 +05'30'

**( सु. सं. धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
३. सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
४. विभागीय आयुक्त (सर्व)
५. जिल्हाधिकारी, (सर्व)
६. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
८. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०.कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२.मुख्या लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१३.व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे, दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
१४.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१५.सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१७.महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१८. नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
१९.वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३

२०.सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२१.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
२२.सर्व सहसचिव /उपसचिव / अवर सचिव/ कक्ष अधिकारी (फक्त कृषी ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२४.मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
२५.निवडनस्ती (कार्यासन-४अे), कृषी व पदुम विभाग.